महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान
विद्यापीठ नागपूर, कुलगुरू यांना
द्यावयाच्या आर्थिक लाभाबाबत...

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मपवि २०१३ / प्र.क्र. २६ / म्हापसू

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
तारीख: ११ ऑगस्ट, २०१४

<u>वाचा</u>

**१) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, सन १९९८ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १७.**

**२) कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांचे पत्र क्र. मपमविवि / अ.शा.प. ८१/२०१२, दि. १९.१२.२०१२.**

<u>प्रस्तावना</u>

महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, सन १९९८ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १७ च्या अधिनियमातील कलम क्र.१६ (७)(अ) अन्वये कुलगुरू, राज्य शासन वेळोवेळी, भविष्यलक्षी किंवा पूर्वलक्षी प्रभावाने निश्चित करील एवढी वित्तलब्धी घेईल अशी तरतूद आहे. त्यामुळे महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाच्या कुलगुरूंना दयावयाची वित्तलब्धी निश्चित करण्याची बाब शासनस्तरावर विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

<u>शासन निर्णय</u>

आता महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ अधिनियम, १९९८ (१९९८ चा महा.(१७) ) यांच्या कलम १६ च्या पोट-कलम(७) च्या खंड(अ) व्दारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा याबाबतीत त्यास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्र शासन याव्दारे कुलगुरूंना देण्यात येणारी एकूण वित्तलब्धी विनिर्दिष्ट करीत असून, ती दि.१ जानेवारी, २००६ पासून खालीलप्रमाणे लागू राहील:-

१) कुलगुरूंना रूपये ७५,०००/- (रूपये पंच्चाहत्तर हजार फक्त) ठोक वेतन आणि रूपये ५,०००/- (रूपये पाच हजार फक्त) इतका विशेष भत्ता शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र. मपवि २००९/प्र.क्र.४४८/पदुम-१(अ), दिनांक १५ जुलै, २०१० अन्वये लागू केल्याप्रमाणे अनुज्ञेय राहील.

२) कुलगुरूंना राज्य शासनाने वेळोवेळी घोषित केल्याप्रमाणे महागाई भत्ता देय असेल.

३) कुलगुरूंना राज्य शासनाच्या नियमांनुसार, शहर पूरक भत्ता अनुज्ञेय असेल.

४) कुलगुरू, सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधीत (जीपीएफ) किंवा यथास्थिति नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेत (डीसीपीएस) वर्गणी देईल. नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन (डीसीपीएस) या योजनेत विद्यापीठ आपला नियोक्ता हिस्सा विद्यापीठाच्या इतर अधिकाऱ्यांसाठी विहित केलेल्या प्रमाणात अंशदान देईल.

५) कुलगुरू, गट विमा योजनेचे वर्गणीदार होतील, वर्गणी शासनाच्या धोरणानुसार भरतील.

६) कुलगुरूंना राज्य शासनाच्या नियमांनुसार स्वग्राम प्रवास सवलत देय असेल.

७) कुलगुरूंना राज्य शासनाच्या नियमांनुसार, कुलगुरू म्हणून, त्याच्या कर्तव्यार्थ रूजू होताना व कुलगुरू पदाचा कार्यकाळ पूर्ण केल्यानंतर कार्यमुक्त होताना बदली प्रवासभत्ता अनुज्ञेय असेल.

८) कुलगुरूंना प्रतिवर्ष रूपये १०,०००/- (रूपये दहा हजार फक्त) किंवा राज्य शासन वेळोवेळी ठरवील असा आतिथ्य भत्ता अनुज्ञेय असेल.

९) कुलगुरूंना विद्यापीठाच्या कामकाजाच्या प्रयोजनार्थ, त्याच्या स्वेच्छेने तो पसंत करील त्याप्रमाणे रेल्वेच्या वातानुकुलित पहिल्या वर्गाने किंवा हवाई मार्ग किंवा समुद्रमार्ग किंवा सडक मार्गाने प्रवास करण्यास, महाराष्ट्र शासनाच्या सचिवाच्या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्याला देय असलेल्या दराने, दौऱ्यावर असताना प्रवासभत्ता आणि महागाई भत्ता अनुज्ञेय असेल.

१०) कुलगुरूंना महाराष्ट्र शासनाच्या सचिवाच्या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्याला देय असलेले भाडेमुक्त व सुसज्ज निवासस्थान अनुज्ञेय असेल. (स्पष्टीकरण- सुसज्ज या शब्दप्रयोगाचा अर्थ- कर, सेवा आकार, वीज आकार, पाणी आकार, दूरध्वनी आकार व इंधन आकार यावरील प्रत्यक्ष खर्च असा असून यामध्ये या बाबींचा समावेश होतो.)

११) कुलगुरूंना विद्यापीठाच्या प्रयोजनार्थ, त्याच्या वापरासाठी वाहनचालकासह मोटारगाडी देण्यात येईल. मोटारगाडीची देखभाल, दुरूस्ती व सुटे भाग बदलणे यावरील खर्च विद्यापीठाकडून सोसण्यात येईल. कुलगुरूंनी खाजगी प्रयोजनासाठी वाहनचालकासह मोटारगाडीचा वापर केल्यास शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासननिर्णयान्वये निश्चित केलेल्या दरा नुसार होणारी रक्कम विद्यापीठास भरणे कुलगुरुंना बंधनकारक राहील.

१२) कुलगुरूंना त्याच्या पदावधीमध्ये राज्य शासनाच्या म.ना.से. नियमांनुसार अर्जित रजा व अर्धवेतनी रजा अनुज्ञेय राहील. शिल्लक अर्जित रजा व रजा रोखीकरणाची कमाल मर्यादा राज्य शासनाच्या नियमांनुसार लागू राहिल.

१३) कुलगुरूंच्या पदावधीतील रजा वेतन व निवृत्तीवेतन अंशदानाची रक्कम महाराष्ट्र नागरी सेवा नियमानुसार महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर हे कुलगुरुंच्या मूळ आस्थापनेला प्रदान करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१११२१५५०२६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bharose Varsha M

Digitally signed by Bharose Varsha M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bharose Varsha M
Date: 2014.08.11 16:42:40 +05'30'

**व.मुं. भरोसे**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती, (म.प.म.वि.वि. नागपूर) यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री महोदयाचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. उपमुख्यमंत्री महोदयाचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा.राज्यमंत्री (पशुसंवर्धन / मत्स्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई-३२
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई-३२
८. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
९. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय मुंबई-३२.
१२. सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक
१३. आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य, पुणे - १,
१४. कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, सेमिनरी हिल्स, नागपूर,
१५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई-३२
१६. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर

१७. प्रादेशिक सहआयुक्त, पशुसंवर्धन नागपूर विभाग, नागपूर

१८. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, तेलंगखेडी, नागपूर-१

१९.नियंत्रक, (वित्त व लेखा) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, तेलंगखेडी, नागपूर-१

२०. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर

२१.वरीष्ठ प्रशासन अधिकारी गट-अ प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन नागपूर विभाग,नागपूर

२२. कार्यासन पदुम १६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय मुंबई - ३२.

२३. निवड सुची ,म्हापसू कृषि व पदुम विभाग,मंत्रालय मुंबई - ३२.